**कार्बन क्रेडिट्स संदर्भात राष्ट्रीय धोरणाची राज्यामध्ये सुलभ अंमलबजावणी करण्यासाठी 'कार्बन बाजारपेठ सुविधा कक्ष' स्थापित करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**पर्यावरण व वातावरणीय बदल विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक: राकृक- २०२५/ प्र. क्र. ७९/ तां. क. १**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०००३२
दिनांक : ३० एप्रिल २०२५

**<u>प्रस्तावना:</u>**

वातावरणीय बदल ही सध्या जगासमोरील एक गंभीर समस्या आहे व त्यामुळे नैसर्गिक परिसंस्था, मानवी आरोग्य आणि जागतिक अर्थव्यवस्थांना गंभीर धोका निर्माण झाला आहे. वातावरणीय बदलाचे मुख्य कारण म्हणजे मानवी क्रियाकलापांमुळे पृथ्वीच्या वातावरणात हरितगृह वायूंमध्ये होणारी वाढ. ऊर्जा निर्मिती, वाहतुक, उद्योग व इतर मानवी क्रियांसाठी होणारा कोळसा, तेल आणि नैसर्गिक वायू यांसारख्या जीवाश्म इंधनांचा वापर मोठ्या प्रमाणात कार्बन डायऑक्साइड ($CO_2$) व इतर हरितगृह वायूंच्या उत्सर्जनास कारणीभूत आहे.

२. हरितगृह वायूंचे उत्सर्जन कमी करण्यासाठी अनेक आंतरराष्ट्रीय करारांशी भारत वचनबद्ध आहे. यात शतकाखेरीस पृथ्वी चे सर्वसाधारण तापमान मर्यादित ठेवण्यासाठी जगातील १९५ देशांनी मान्य केलेल्या २०१५ च्या पॅरिस आंतरराष्ट्रीय कराराचा समावेश आहे. तसेच भारताने सादर केलेल्या राष्ट्रीय निर्धारीत योगदानानुसार (**Nationally Determined Contributions**), देशाने २०७० पर्यंत कार्बन उत्सर्जन निव्वळ शून्यापर्यंत (**Net Zero**) आणण्याचे उद्दिष्ट ठेवले आहे. भारताच्या राष्ट्रीय स्तरावर निश्चित केलेल्या सुधारित योगदानांतर्गत (NDCs) राष्ट्रीय सकल उत्पन्नाच्या (GDP) कार्बन उत्सर्जनाची तीव्रता सन २०३० पर्यंत ४५ टक्क्यांनी कमी करावयाचे उद्दिष्ट ठरविण्यात आले आहे. याशिवाय सन २०३० पर्यंत देशाच्या एकूण स्थापित विद्युत क्षमतेच्या ५०% ऊर्जा निर्मिती अपारंपरिक स्त्रोतांतून करण्याचे उद्दिष्ट निश्चित करण्यात आले आहे.

३. हरितगृह वायूंचे उत्सर्जन कमी करण्याकरता अवलंबिल्या जाणाऱ्या विविध उपायांमधे कार्बन बाजारपेठा एक महत्वपूर्ण साधन म्हणून वाढत्या प्रमाणात ओळखल्या जात आहेत. कार्बन बाजारपेठा ह्या अशा व्यापार प्रणाली आहेत ज्यामध्ये कार्बन उत्सर्जन क्रेडिट्सची खरेदी-विक्री केली जाते, ज्यामुळे हरितगृह वायू (GHG) उत्सर्जन कमी करण्यासाठी आर्थिक प्रोत्साहन मिळते. ह्या बाजारपेठा कार्बन प्रदूषणाची किंमत निश्चित करण्यास मदत करतात, व्यवसाय आणि देशांना स्वच्छ, कमी-कार्बन तंत्रज्ञानाचा (Low Carbon Technologies) अवलंब करण्यास प्रोत्साहित करतात. सदर बाजारात कार्बन डायऑक्साइड समतुल्य ($CO_2$ equivalent) क्रेडिट्सचा व्यापार केला जातो, ज्यामध्ये एक टन $CO_2e$ हे मानक (standard unit) म्हणून वापरले जाते.

४. अखिल भारतीय स्तरावरील कार्बन क्रेडिट मार्केट डिसेंबर, २०२२ मध्ये अस्तित्वात आले. त्याचे नियमन राष्ट्रीय कार्बन व्यापार धोरणाद्वारे केले जाते. भारत सरकारने त्याबाबत पुढील धोरणे निश्चित केली आहेत.

**i. कार्बन क्रेडिट ट्रेडिंग स्कीम (CCTS)**

कार्बन उत्सर्जन कमी करण्याचे उद्दिष्ट साध्य करण्यासाठी भारत सरकारने एकात्मिक कार्बन बाजार 'इंडियन कार्बन मार्केट' (ICM) विकसित करण्यास सुरुवात केली आहे. याद्वारे खाजगी आणि सार्वजनिक संस्थांकडून कार्बन क्रेडिट्सच्या मागणीद्वारे उत्सर्जन कमी करण्याचा एक नावीन्यपूर्ण व प्रभावी मार्ग दाखविण्यात आला आहे.

ऊर्जा संवर्धन कायदा, २००१ आणि पर्यावरण (संरक्षण) कायदा, १९८६ च्या कक्षेत ICM ची स्थापना करण्यात आली आहे. ऊर्जा संवर्धन कायद्याच्या कलम १४ नुसार केंद्र सरकारला ऊर्जा दक्षता ब्युरो (BEE) शी सल्लामसलत करून कार्बन क्रेडिट ट्रेडिंग स्कीम (CCTS) निर्दिष्ट करण्याचा आणि वेगवेगळ्या यंत्रणांअंतर्गत नोंदणीकृत संस्थांना 'कार्बन क्रेडिट प्रमाणपत्रे' (Carbon Credit Certificates) जारी करण्याचा अधिकार देण्यात आला आहे.

त्यास अनुसरून भारत सरकारने २८ जून २०२३ रोजी ऊर्जा संवर्धन (२००१) कायद्याअंतर्गत कार्बन क्रेडिट ट्रेडिंग स्कीम (CCTS), २०२३ अधिसूचित केली आहे. CCTS अंतर्गत कार्बन क्रेडिट प्रमाणपत्रांच्या व्यापाराद्वारे हरितगृह वायू उत्सर्जनाचे मूल्यमापन करून भारतीय अर्थव्यवस्थेतील हरितगृह वायू उत्सर्जन (GHGs) कमी करणे, काढून टाकणे किंवा टाळणे या उद्देशाने एक राष्ट्रीय चौकट स्थापित (National Framework) करण्यात आली आहे.

CCTS अंतर्गत देखरेख आणि कामकाजासाठी राष्ट्रीय सुकाणू समिती (NSC-ICM) स्थापित करण्यात आली आहे. केंद्रीय ऊर्जा मंत्रालायचे मा. सचिव हे त्याचे अध्यक्ष असून पर्यावरण, वने व वातावरणीय बदल मंत्रालयाचे मा. सचिव हे सह अध्यक्ष आहेत. राज्याच्या मा. सचिव, पर्यावरण व वातावरणीय बदल विभाग या त्याच्या सदस्या आहेत. CCTS च्या मुख्य वैशिष्ट्यांमध्ये दोन यंत्रणांचा समावेश आहे: अनुपालन यंत्रणा (compliance mechanism) जी दायित्वप्राप्त (obligated entities) संस्थांकरीता आहे व ऑफसेट यंत्रणा (offset mechanism) जी गैर-दायित्वप्राप्त (non-obligated entities) संस्थांकरीता आहे. CCTS अनुपालन यंत्रणेच्या कार्यकक्षेत ॲल्युमिनियम, सिमेंट, क्लोर-अल्कली, फर्टिलाइजर, आयर्न अँड स्टील, पल्प अँड पेपर, पेट्रोकेमिकल्स, पेट्रोलियम रिफायनरी आणि टेक्सटाइल या नऊ क्षेत्रांचा समावेश आहे. ऑफसेट यंत्रणेअंतर्गत, दहा क्षेत्रांना मान्यता देण्यात आली आहे ज्यामध्ये ऊर्जा, उद्योग, कचरा हाताळणी आणि विल्हेवाट, शेती, वनीकरण, वाहतूक, बांधकाम, फ्युजिटीव उत्सर्जन, सॉल्व्हेंट वापर आणि कार्बन कॅप्चर वापर आणि साठवणूक यांचा समावेश आहे.

**ii. ग्रीन क्रेडिट प्रोग्रॅम**

पर्यावरण संरक्षण कायदा, १९८६ अंतर्गत, भारत सरकारच्या पर्यावरण वन व जलवायु परिवर्तन मंत्रालयाने १२ ऑक्टोबर २०२३ रोजी ग्रीन क्रेडिट प्रोग्रॅम अंतर्गत ग्रीन क्रेडिट नियम (Green Credit Rules) अधिसूचित केले आहेत. सदर नियम देशभरात स्वयंसेवी वृक्षारोपण (voluntary plantation) करण्यास प्रोत्साहन देण्यासाठी विकसित करण्यात आले आहेत. या नियमांतर्गत वनिकरणासाठी (afforestation) ग्रीन क्रेडिट्स दिले जातात.

५. कार्बन क्रेडिट्स च्या संदर्भात भारत सरकारची धोरण निश्चिती झाली असल्याने राष्ट्रीय धोरणाची राज्यामध्ये सुलभ अंमलबजावणी करण्यासाठी **कार्बन बाजारपेठ सुविधा कक्ष (Carbon Market Facilitation Desk)** स्थापित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:**

प्रस्तावनेत नमूद केलेल्या बाबींचा विचार करून राष्ट्रीय धोरणाची राज्यामध्ये सुलभ अंमलबजावणी करण्यासाठी, कार्बन क्रेडिट बाजाराबाबत जनजागृती करण्यासाठी, संबंधित घटकांना कार्बन क्रेडिट ट्रेडिंग स्कीमचा लाभ मिळण्याकरीता आवश्यक ती माहिती प्रदान करण्यासाठी, विहित कार्यपद्धती व प्रक्रियांचे अनुपालन करण्यासाठी, योजनेचा लाभ घेण्यासाठी पात्र असणारे प्रकल्प शोधून त्यांना मदत करण्यासाठी **कार्बन बाजारपेठ सुविधा कक्ष (Carbon Market Facilitation Desk)** स्थापित करण्यास शासन मान्यता देत आहे.

**I. कार्बन बाजारपेठ सुविधा कक्षाची रचना:**

- पर्यावरण व वातावरणीय बदल विभागातील राज्य वातावरणीय कृती कक्षांतर्गत कार्बन बाजारपेठ सुविधा कक्षाची स्थापना करण्यात येईल.
- कार्बन बाजारपेठ सुविधा कक्षात खालीलप्रमाणे दोन पदांवर संबंधित क्षेत्रातील शैक्षणिक पात्रता व अनुभव असलेल्या तज्ञांची नियुक्ती कंत्राटी तत्वावर करण्यात येईल:
    - कार्बन मार्केट स्पेशलिस्ट - कार्बन अनुपालन बाजारपेठ (**Compliance Carbon Market**)
    - कार्बन मार्केट स्पेशलिस्ट - स्वयंसेवी कार्बन बाजारपेठ (**Voluntary Carbon Market**).
- याशिवाय आवश्यकतेनुसार तज्ञ व्यक्ती कंत्राटी तत्वावर भरता येतील.
- आवश्यकतेनुसार तज्ञ संस्थांचे सहकार्य व मार्गदर्शन वेळोवेळी घेण्यात येईल.

**शैक्षणिक पात्रता/अनुभव/कौशल्ये:**

- वरील पदांवर नियुक्तीसाठी आवश्यक असलेली शैक्षणिक पात्रता/अनुभव/कौशल्ये खालील प्रमाणे असतील:

अ. **कार्बन मार्केट स्पेशलिस्ट** - कार्बन अनुपालन बाजारपेठ (**Compliance Carbon Market**)

- पर्यावरणीय अर्थशास्त्र, सार्वजनिक धोरण, ऊर्जा, वातावरणीय विज्ञान किंवा तत्सम संबंधित विषयामध्ये मान्यताप्राप्त विद्यापीठातून पदव्युत्तर पदवी.
- कार्बन मूल्यांकन, उत्सर्जन व्यापार व्यवस्था धोरण (**Emission Trading System Policy**), मापन, मूल्यांकन व पडताळणी प्रणाली (Measurement, Reporting, and Verification (MRV)) किंवा संबंधित क्षेत्रातील किमान ३ वर्षांचा कामाचा अनुभव.
- नियामक संस्था, उद्योग किंवा आंतरराष्ट्रीय वातावरणीय प्रकल्पांबाबतच्या अनुभवास प्राधान्य दिले जाईल.

- भारताच्या **PAT** योजना, ऊर्जा लेखापरीक्षण (energy auditing) किंवा कोणत्याही उत्सर्जन व्यापाराशी संबंधित प्रकल्पांशी परिचित असल्यास प्राधान्य दिले जाईल.
- मानधन: १,००,००० – १,२५,००० रुपये दरमहा

ब. **कार्बन मार्केट स्पेशलिस्ट** - स्वयंसेवी कार्बन बाजारपेठ (**Voluntary Carbon Market**).

- शाश्वत विकास, वातावरणीय वित्त, नैसर्गिक संसाधन व्यवस्थापन, कृषी, वनीकरण किंवा तत्सम संबंधित विषयामध्ये मान्यताप्राप्त विद्यापीठातून पदव्युत्तर पदवी.
- कार्बन ऑफसेट प्रकल्प विकास, कार्बन क्रेडिट पडताळणी किंवा **VCM** वित्तपुरवठा या क्षेत्रात किमान ३ वर्षांचा कामाचा अनुभव.
- व्हेरा, गोल्ड स्टँडर्ड, प्लॅन व्हिव्हो किंवा सीसीबी स्टँडड्र्स सारख्या मानकांचा अनुभव असल्यास प्राधान्य दिले जाईल.
- सह-लाभ प्रमाणपत्रे (Co-benefit Certifications) (उदा. **SDVISta, W+ standard**) आणि निसर्ग-आधारित उपायांशी (**Nature-based Solutions)** परिचित असल्यास प्राधान्य दिले जाईल.
- मानधन: १,००,००० – १,२५,००० रुपये दरमहा

**II.** **आर्थिक तरतूद:** कार्बन बाजारपेठ सुविधा कक्षांतर्गत नियुक्त केलेल्या तज्ञांचे मानधन व कार्बन बाजारपेठ सुविधा कक्षाचा इतर कार्यालयीन/प्रशासकीय खर्च महाराष्ट्र प्रदूषण नियंत्रण मंडळाच्या निधीतून अदा करण्यात येईल.

**III.** **कार्बन बाजारपेठ सुविधा कक्षांतर्गत कामाची व्याप्ती:**

**अ) अनुपालन बाजारपेठेशी संबंधित जबाबदऱ्या:**

i. नियामक समर्थन
   a. CCTS अनुपालन बाजाराच्या कार्यक्षेत्रातील दायित्वप्राप्त संस्थांना माहिती देणे व मार्गदर्शन करणे.
   b. राष्ट्रीय धोरणावर आधारीत एक तपशीलवार कार्यप्रणाली (Standard Operating Procedure) तयार करणे.
   c. CCTS अनुपालन यंत्रणेचे मापन, अहवाल आणि पडताळणी (Measurement, Reporting, and Verification (MRV)) चौकटीची पूर्तता करण्यास दायित्वप्राप्त संस्थांना मदत करणे
   d. कार्बन पडताळणी करीता यंत्रणा तयार करणे.

ii. क्षमता बांधणी करणे

iii. धोरणात्मक सल्ला व माहिती देणे
   a. दायित्वप्राप्त संस्थांना मदत करण्यासाठी नियामक जबाबदाऱ्या आणि अहवाल देण्याची आवश्यकता पूर्ण करण्यासाठी क्षेत्रवार हँडबुक आणि तपशीलवार मार्गदर्शक तत्वे विकसित करणे.

b. CCTS अनुपालन यंत्रणेअंतर्गत दायित्वप्राप्त संस्थांसाठी उत्सर्जन कमी करण्याबाबत क्षेत्र-विशिष्ट अहवाल तयार करणे.

c. CCTS अनुपालन बाजारपेठेतील कार्बन व्यापार क्रियाकलापांबद्दल संबंधित भागधारकांना माहिती प्रदान करण्यासाठी महाराष्ट्र-विशिष्ट व्यापार अहवाल दर दोन वर्षांनी प्रकाशित करणे.

**ब) स्वयंसेवी कार्बन बाजारपेठ यंत्रणेसंबंधित (Voluntary Carbon Market Mechanism) समर्थन**

i. यासंबंधीत पूरक धोरणे आणि संस्थात्मक सहकार्य अधोरेखित करणे
ii. यासंबंधीत विविध क्षेत्रे, पायाभूत सुविधा आणि भागधारकांचा अनुभव समजून घेणे
iii. भागधारकांची क्षमता बांधणी करणे
iv. संबंधित दस्तऐवजीकरण सुलभ करणे आणि या क्षेत्रातील यशोगाथा प्रदर्शित करणे
v. ऑफसेट मार्केट्सची व्याप्ती वाढवण्यासाठी इतर निव्वळ शून्य राज्यांशी सहकार्य करणे.

**क) पॅरिस करारातील अनुच्छेद ६ संबंधित समर्थन**

i. अनुच्छेद ६ मधील सहभागासाठी केंद्रीय पर्यावरण, वने व जलवायू परिवर्तन मंत्रालयाने विहित केलेल्या क्रियाकलापांच्या यादीमधून प्रकल्प विकासाची क्षेत्रे विचारात घेऊन प्राधान्यक्रम सुलभ करणे.
ii. कार्बन व्यापार आणि वातावरणीय वित्तपुरवठा वाढवण्यासाठी इतर देशांसोबत द्विपक्षीय सहभाग सुलभ करणे.
iii. भारतातील उच्च-प्रभाव प्रकल्पांना आकार देण्यासाठी वातावरणीय वित्तपुरवठ्याच्या वापरास समर्थन देणे.
iv. राज्याच्या डिकार्बनायझेशन संबंधित कामाची व्याप्ती वाढवणे.

**ड) कार्बन बॉर्डर अडजस्टमेंट मेकॅनिझम (CBAM)**

i. संशोधन शाखा स्थापित करणे.
   - उद्योग आणि राज्यावर CBAM चा आर्थिक प्रभाव ओळखण्यासाठी संशोधन करणे.
   - व्यवहार्य शमन धोरणे आखण्यासाठी क्षेत्र-विशिष्ट डीकार्बनायझेशनचे मार्ग शोधणे.
ii. CBAM-संरेखित मापन, अहवाल आणि पडताळणी (Measurement, Reporting, and Verification (MRV)) प्रक्रियांबाबत क्षमता बांधणी करणे.
iii. CBAM पडताळणी करीता यंत्रणा तयार करणे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्र. २०२५०४३०१७३१०९९१०४ आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SURYAKANT KISAN NIKAM

Digitally signed by SURYAKANT KISAN NIKAM
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=ENVIRONMENT AND CLIMATE CHANGE DEPARTMENT, 2.5.4.20=3978ce8e745a91e0561f6f9473df7e92873ee7ac8c2f7c49ac520e61061ddded, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=3A94A1F658A34D45CA2859DBC88DFB40760079B8946087EF0FB8BC7CD7314C27, cn=SURYAKANT KISAN NIKAM
Date: 2025.04.30 17:33:46 +05'30'

**(सु. कि. निकम)**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. मा. राज्यपाल महादेय यांचे प्रधान सचिव, राजभवन, मुंबई
२. मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा. उप मुख्यमंत्री, (नगरविकास, गृहनिर्माण, सार्वजनिक बांधकाम- सार्वजनिक उपक्रम), यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. मा. उप मुख्यमंत्री (वित्त व नियोजन, राज्य उत्पादन शुल्क), यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
५. मा. सभापती, महाराष्ट्र विधान परिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
६. मा. अध्यक्ष, महाराष्ट्र विधान सभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
७. मा. मंत्री (सर्व), मंत्रालय, मुंबई.
८. मा. मंत्री, पर्यावरण व वातावरणीय बदल, मंत्रालय, मुंबई.
९. मा. राज्यमंत्री (सर्व), मंत्रालय, मुंबई.
१०. मा. विरोधी पक्ष नेता, विधान परिषद महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
११. मा. विरोधी पक्ष नेता, विधान सभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
१२. मा. उप सभापती, महाराष्ट्र विधान परिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
१३. मा. उपाध्यक्ष, महाराष्ट्र विधान सभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
१४. मा. मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
१५. मा. अ.मु.स. / प्रधान सचिव / सचिव, (सर्व विभाग), मंत्रालय, मुंबई
१६. मा. अ.मु.स. / प्रधान सचिव / सचिव, पर्यावरण व वातावरणीय बदल विभाग, मंत्रालय, मुंबई
१७. मा. अध्यक्ष, महाराष्ट्र प्रदुषण नियंत्रण मंडळ, मुंबई
१८. मा. विकास आयुक्त, उद्योग, मंत्रालय, मुंबई
१९. मा. मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ
२०. मा. सदस्य सचिव, महाराष्ट्र प्रदुषण नियंत्रण मंडळ, मुंबई
२१. आयुक्त, कृषी
२२. आयुक्त, परिवहन
२३. महासंचालक, मनरेगा, मंत्रालय, मुंबई

२४. महासंचालक, मेडा, पुणे
२५. संचालक, राज्य वातावरणीय कृती कक्ष, पर्यावरण व वातावरणीय बदल विभाग, मंत्रालय, मुंबई
२६. अभियान संचालक, माझी वसुंधरा अभियान, पर्यावरण व वातावरणीय बदल विभाग, मंत्रालय, मुंबई
२७. सर्व विभागीय आयुक्त
२८. सर्व जिल्हाधिकारी
२९. आयुक्त, सर्व महानगरपालिका
३०. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)
३१. मुख्याधिकारी, सर्व नगरपरिषदा/ नगर पंचायती
३२. निवडनस्ती